वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट मांजरी (बु.) ता. हवेली जिल्हा पुणे या संस्थेस सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता साखर संशोधनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१९ /प्र.क्र.२०२ /२५स,**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,

दिनांक: २७.०३.२०२०

वाचा -

१) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका १००९/प्र.क्र.१३७१ प्र.क्र. १२/२५स,दिनांक १७/६/२००९.

२) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका १००९/प्र.क्र.१२६/ २५-स, दिनांक १८/८/२००९.

३) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र ससाका २०१९/ प्र.क्र.२०२/२५ स दिनांक २२.११.२०१९

४) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. / साआ /अर्थ ३/ कक्ष-६/ व्हीएसआय/ उर्वरीत अनु. २० /९१ , दिनांक २०.१.२०२०

५) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र. पूरक - २०२० / प्र.क्र. ५४ / अर्थ-३ /दि. ११.३.२०२०

६) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र. ९२ / अर्थ-३ /दि. १३.३.२०२०

७)) शासन ज्ञापन ,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र आसुअं - १८१९/ प्र.क्र. ४८ /१७ स दिनांक १३.३.२०२०

**शासन निर्णय-**

साखर संशोधनासाठी सहायक अनुदान यासाठी सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित रु. ५,००,००,०००/- ( रुपये पाच कोटी फक्त ) तरतुदीपैकी ६० % म्हणजेच रु.३,००,००,०००/- (रुपये तीन कोटी फक्त ) वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस अदा करण्यास शासन निर्णय दि. २२.११.२०१९ अन्वये मंजूरी दिली आहे. आता वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा येथील क्रमांक ५ व ६ येथील दि. ११.३.२०२० व दि.१२.३.२०२० च्या परिपत्रकातील तरतुदीनुसार तसेच उपरोक्त वाचा क्रमांक ७ येथील सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग , शासन ज्ञापन दि. १३.३.२०२० मधील निर्देशानुसार साखर संशोधनासाठी सहायक अनुदान यासाठी सन २०१९-२० साठी सुधारित अर्थसंकल्पित रु.९,५२,००,०००/-( रुपये सहा कोटी बावन्न लाख फक्त ) मंजूर निधीतील उर्वरित तरतूद रु. ६,५२,००,००० /- (रुपये सहा कोटी बावन्न लाख फक्त ) वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.), ता. हवेली, जिल्हा- पुणे या संस्थेस अदा करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे. सदरहू निधीचा वापर करताना शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक ससाका- १००९ /प्र.क्र. २६ /२५ स, दिनांक १८ ऑगस्ट, २००९ अन्वये विहित करण्यात आलेल्या नियम व अटीचे पालन करणे बंधनकारक आहे. तसेच सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सदर अनुदानाचा संपूर्ण विनियोग केल्यानंतर सनदी लेखा परिक्षकाकडून प्रमाणित करुन हे वित्तीय वर्ष संपल्यानंतर परंतु, पुढील वर्षाच्या वितरणापूर्वी सादर करावे.

२. रु. ६,५२,००,००० /- (रुपये सहा कोटी बावन्न लाख फक्त ) इतकी रक्कम " मागणी क्रमांक-व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष-२४२५-सहकार,१०८इतर सहकारी संस्थांना सहाय्य-(०३) सहकारी साखर कारखाने-, (०३)(०६) साखर संशोधनासाठी सहायक अनुदान ( अनिवार्य ) (२४२५ १०४५), ३१, सहायक अनुदाने ( वेतनेतर ) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावी. सदर खर्च सन २०१९-२० साठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी बु., ता. हवेली, जिल्हा - पुणे (VASANTDADA SUGAR INSTITUTE, MANJARI (BK.) TALUKA - HAVELI, DISTRICT-PUNE) या संस्थेस अनुदान म्हणून मंजूर केलेली रक्कम रु रु. ६,५२,००,००० /- (रुपये सहा कोटी बावन्न लाख फक्त ) जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे यांचे कार्यालयामार्फत त्या संस्थेला वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. साखर आयुक्त, पुणे यांनी सदर तरतूद वितरीत करताना तसेच खर्च करताना महाराष्ट्र अर्थ संकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाने ह्या पूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे आणि उपरोक्त वाचा क्रमांक ७ येथील सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग , शासन ज्ञापन दि. १३.३.२०२० मधील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय हा शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१९ / प्र.क्र. ९२ / अर्थ-३ / दि. १३.३.२०२० आणि शासन ज्ञापन ,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र आसुअं - १८१९/ प्र.क्र. ४८ /१७ स दिनांक १३.३.२०२० मधील निर्देशानुसार आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमाक१३५/२०२० व्यय २ दि.५.३.२०२० व दि.१७/३/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६ . सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००३२७१६०५४२४९०२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2020.03.27 16:09:52 +05'30'

**( प्रमोद वळंज )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) मुंबई.
६) महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-३/ १२, (अर्थोपाय शाखा)
१२) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी (बु.),ता. हवेली, जिल्हा - पुणे.
१३) अवर सचिव , १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सह संचालक, लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती ( २५-स.)